महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या नियतकालीक बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः आकृवि १०२३/प्र.क्र.३२ (७) /नागपूर/१५अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक : २८ जून, २०२३.

संदर्भ:- १)"महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनिय,२००५." ची दि.२५/५/२००६ ची अधिसूचना.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक बदली-२०२३/प्र.क्र.३२/कार्या.१२, दि.३०/५/२०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रत्येक वर्षी एप्रिल व मे महिन्यात सर्वसाधारण बदल्या करण्यात येतात.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार आणि संदर्भ क्र.२ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये सर्वसाधारण बदल्यांकरीता दिलेल्या मुदतवाढीस अनुसरुन बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने नियतकालिक बदलीस पात्र असलेल्या या विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री.पवार संदिप जगन्नाथ<br>तंत्र अधिकारी (गुनि), विभागीय कृषि सहसंचालक कार्यालय, नागपूर | जिल्हा कृषि अधिकारी, सामान्य, जिल्हा परिषद,पुणे<br>(रिक्त पदी) |
| २ | श्रीमती शास्त्री अनुरुपा राहूल<br>सहाय्यक संचालक, प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती),नागपूर | तंत्र अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय, नागपूर.<br>( रिक्त पदी) |
| ३ | श्री.ठाकरे मंगेश अरुण<br>तंत्र अधिकरी, उपविभागीय कृषि अधिकारी कार्यालय, वर्धा | जिल्हा बीज प्रमाणीकरण अधिकारी, अमरावती<br>(श्री.टिक्कस यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |

२.	उपरोक्त अधिकाऱ्यांनी आपल्या पदाचा कार्यभार समकक्ष वा नजीकच्या कनिष्ठ अधिकाऱ्याकडे सोपवून नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३.	संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर न करता त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या बदलीच्या जागी रूजू होण्यास सांगावे. जे नियंत्रण अधिकारी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना विहित मुदतीत कार्यमुक्त करणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांविरूध्द शिस्तभंग कारवाईचा प्रस्ताव आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावा.

४.	आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०६२८२१५९२१६७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2023.06.28 22:00:10 +05'30'

**( अ. नि. साखरकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे.
६. संबंधित विभागीय कृषि सह संचालक ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
७. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
८. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१०. संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
११. निवड नस्ती /१५अे.